प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत राज्य शासन व केंद्र शासन यांच्या संयुक्त विद्यमाने आयुक्त (कृषि) यांच्या स्तरावर राष्ट्रीयकृत बँकमध्ये ESCROW खाते सुरु करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रपिवियो-२०२३/प्र.क्र.६९/२ अे,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: २६ जून, २०२३

वाचा :-

१) केंद्र शासनाचे पत्र क्र. एफ क्र.११०१९/०१/२०२२-सीआर-II(/एफटीएस-१११८७५), दि.०३ एप्रिल, २०२३.
२) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.पिवियो /सां.८ /ESCROW /१६३८०/२०२३, दि.१६ मे, २०२३

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत खरीप हंगाम २०१६ पासून राज्यात राबविण्यात येत आहे. सदर योजनेंतर्गत राज्य सरकारकडून विमा कंपन्यांना काम वाटपाच्या वेळी मागील हंगामातील विमा हप्त्याच्या ५०% अग्रीम विमा हप्ता अनुदान ESCROW खात्यामार्फत अदा करण्याकरीता राज्य आणि केंद्र सरकार यांच्या संयुक्त विद्यमाने ESCROW खाते कार्यान्वीत करणेबाबत आणि सदरील खाते राज्य सरकारद्वारे निवडल्या जाणा-या कोणत्याही राष्ट्रीयकृत बँकेत उघडणेबाबत केंद्र शासनाने संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये कळविले आहे. केंद्र शासनाने यासंदर्भात निर्गमित केलेल्या सुचना तसेच कृषि आयुक्तालय यांचे संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीनुसार प्रस्तुत प्रकरणी आयुक्त (कृषि) यांच्या स्तरावर राष्ट्रीयीकृत बँकेत ESCROW खाते सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत राज्य सरकारकडून विमा कंपन्यांना काम वाटपाच्या वेळी मागील हंगामातील विमा हप्त्याच्या ५०% अग्रीम विमा हप्ता अनुदान ESCROW खात्यामार्फत अदा करण्याकरीता राज्य आणि केंद्र सरकार यांच्या संयुक्त विद्यमाने ESCROW खाते कार्यान्वीत करण्यासाठी आयुक्त (कृषि) यांच्या स्तरावर राष्ट्रीयीकृत बँकेत ESCROW खाते सुरु करण्यास खालीलप्रमाणे नमुद अटींच्या अधीन राहुन शासन मान्यता देण्यात येत आहे.

(१) सदर बँक खात्यात इतर कोणतेही व्यवहार करु नयेत.
(२) सदर खात्यात निधी जमा केल्यानंतर केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार निधी हस्तांतरित करण्याची कार्यवाही करावी.

(३) सदर खात्याचे नियमांनुसार लेखापरीक्षण करुन घेण्यात यावे.

(४) सदर खात्यामधून कृषि आयुक्तालयामार्फत संबंधित विमा कंपन्यांस अदा करण्यात आलेला निधी याबाबतचा त्रैमासिक अहवाल शासनास सादर करावा.

२. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक १३८/२३/कोषा-प्रशा-५, दि.०१.०६.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२६१८४५०६७१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH BANSIRAO KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340cd5420df7cbaa28990d692e36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995A4F22FDC0240939AAB0835, cn=SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2023.06.27 16:24:07 +05'30'

**( संतोष कराड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
२. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
३. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. सह सचिव (११-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
५. उप सचिव (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
६. संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
११. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१२. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई- ३२
१३. कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१४. विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, स्टॉक एक्सचेंज टॉवर्स, २० वा मजला, दलाल स्ट्रीट,फोर्ट, मुंबई-४०० ०२३
१५. निवड नस्ती (कार्यासन २-अे).